**सेंटर ऑफ एक्सलन्स योजनेंतर्गत ॲडव्हान्स मॉडयुलच्या अभ्यासक्रमासाठी तसेच विद्यमान औ. प्र. संस्थांमध्ये अधिकचे/नविन व्यवसाय सुरू करण्याकरिता योजनांतर्गत मंजूर करण्यात आलेली १६५ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत..**

# महाराष्ट्र शासन

**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : आयटीआय-२०१७/प्र.क्र. ६३/व्यशि-३,.**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : ०७ मार्च, २०१७.

<u>पहा</u> : १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२ (भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दि. ४/१०/२००४.

२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.आयटीआय-१००६/(५२/०६)/ व्यशि-२, दि. २४/०८/२००६.

३) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.आयटीआय-१००६/(३५७/०६)/ व्यशि-२, दि. १२/०४/२००६ व समक्रमांकाचे दि. १२.०३.२००९ चे शुध्दीपत्रक.

४) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.आयटीआय-१००६/(६६/०७)/ व्यशि-२, दि. १३/०६/२००८.

५) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क., दि. १०.०२.२०१७.

६) संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.११/आस्था-३/मुदतवाढ/२०१७/(१६/२१)/२३५, दि. ०३.०३.२०१७.

**<u>प्रस्तावना</u>** :-

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये सेंटर ऑफ एक्सलन्स योजनेंतर्गत ॲडव्हान्स मॉडयुलच्या अभ्यासक्रमासाठी मंजूर १०२ पदांना तसेच विद्यमान औ. प्र. संस्थांमध्ये अधिकचे/नविन व्यवसाय सुरू करण्याकरिता मंजूर ६३ पदे अशा एकूण १६५ पदांना संदर्भीय (२) व (४) येथील शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आलेली आहे. वित्त विभागाच्या संदर्भीय (१) येथील शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयानुसार सदर १६५ अस्थायी पदांना दिनांक २८.०२.२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. वित्त विभागाच्या संदर्भाधिन (५) येथील शासन निर्णयान्वये दिनांक ३०.०९.२०१७ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान केले आहेत. त्यास अनुलक्षून संचालक (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी संदर्भीय (६) येथील पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावानुसार दिनांक ०१.०३.२०१७ ते ३०.०९.२०१७ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये सेंटर ऑफ एक्सलन्स योजनेंतर्गत ॲडव्हान्स मॉडयुलच्या अभ्यासक्रमासाठी मंजूर १०२ योजनांतर्गत अस्थायी पदांना (सोबतच्या प्रपत्र-१ मध्ये दर्शविलेली) दि. ०१.०३.२०१७ ते ३०.०९.२०१७ पर्यंत चालू ठेवण्यास तसेच विद्यमान औ. प्र. संस्थांमध्ये अधिकचे/नविन व्यवसाय सुरू करण्याकरिता मंजूर ६३ योजनांतर्गत पदांना (सोबतच्या प्रपत्र-२ मध्ये दर्शविलेली) दिनांक ०१.०२.२०१७ पासून दिनांक ३०.०९.२०१७ पर्यंत चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यांत येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१) उपरोक्त पदे ज्या प्रयोजनासाठी निर्माण करण्यांत आली, त्याच प्रयोजनासाठी पुढे चालू ठेवण्यात यावीत. चालू ठेवण्यात आलेल्या अस्थायी पदांवरील कर्मचारी नियमानुसार मिळणारे वेतन भत्ते इत्यादी मिळण्यास पात्र समजण्यात यावेत.

२) मुदतवाढ दिलेल्या पदांपैकी कोणतेही पद ६ महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त नाही याची खात्री करून घेण्यात यावी.

३) सदर कालावधीमध्ये मंजूर पदांच्या आढाव्यास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेतलेली आहे. तथापि, त्यानंतर पदनिर्मिती मंजूर झालेली आहे. अशा प्रकरणी नवनिर्मिती पदांच्या समवेक्षनासह पदांच्या आकृतीबंधास मान्यता घेण्याची कार्यवाही विहित कालावधीत पूर्ण करावी.

४) पदांचा आढावा घेवून सुधारित आकृतीबंधास कोणत्याही परिस्थितीत दिनांक ३०.०४.२०१७ पर्यंत उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक आहे. तसे न केल्यास मुदतवाढीअभावी सदर अस्थायी पदांच्या वेतनाचा प्रश्न उद्भवल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांची राहील. या कालावधीनंतर आकृतीबंध निश्चित करण्यासाठी कालावधी वाढवून देण्यात येणार नसल्याची कृपया नोंद घ्यावी.

२. या प्रस्तावावर होणारा खर्च खालील लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

***" मागणी क्र. झेडए-१, २२३० - कामगार व सेवायोजन, ०३ - प्रशिक्षण, (००३)-कारागिर व पर्यवेक्षक यांचे प्रशिक्षण, (०२) - कारागिरांचे तांत्रिक व व्यवसाय प्रशिक्षण(०२)(०३) कारागिरांसाठी तांत्रिक व व्यावसायिक प्रशिक्षणाचा विस्तार (राज्य हिस्सा) (२२३० ए १५६) "***

***" मागणी क्र. झेडए-१, २२३० - कामगार व सेवायोजन, ०३ - प्रशिक्षण, (००३)-कारागिर व पर्यवेक्षक यांचे प्रशिक्षण, (०२) - कारागिरांचे तांत्रिक व व्यवसाय प्रशिक्षण, (०२)(०४) कारागिरांसाठी तांत्रिक व व्यावसायिक प्रशिक्षणाचा विस्तार ( केंद्र हिस्सा) (२२३० ए १६५) "***

***" मागणी क्र. झेडए-१, २२३० - कामगार व सेवायोजन, ०३ -प्रशिक्षण, (००३)-कारागिर व पर्यवेक्षक यांचे प्रशिक्षण, (०२) - कारागिरांचे तांत्रिक व व्यवसाय प्रशिक्षण, (०२)(०८) प्रवेश क्षमता वाढविण्यासाठी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचा विस्तार करणे (२२३० ए २०९) "***

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १० फेब्रुवारी, २०१७ अन्वये प्रशासकीय विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यांत येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३०७१६०३३२७७०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vivek Madhav Patil

Digitally signed by Vivek Madhav Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0363f5e4d45eb33c0938f1f8861984f0e8a091632e6750ca13da0bc6a5549fad, serialNumber=841bf2ba2d65f151b54b8b93f504695966d17aeec76b11455a90a9edb7b50ff1, cn=Vivek Madhav Patil
Date: 2017.03.07 16:05:07 +05'30'

**( विवेक मा. पाटील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. सर्व संबंधित सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, (संचालनालयामार्फत).
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखाधिकारी, मुंबई.
७. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (संचालनालयामार्फत)
८. अवर सचिव/कक्ष अधिकारी (व्यशि-१)/(व्यशि-२)/(व्यशि-५)/(रोस्वरो-२), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अवर सचिव (व्यय-५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.अवर सचिव (का.१४७१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
११.संबंधित प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था (संचालनालयामार्फत).
१२.निवड नस्ती (व्यशि-३), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.

**कौशल्य विकास व उद्योजकत विभाग, शासन निर्णय क्रमांक : आयटीआय-२०१७/प्र.क्र.६३/व्यशि-३, दिनांक : ०७ मार्च, २०१७ सोबतचे सहपत्र**

## प्रपत्र-१

सेंटर ऑफ एक्सलन्स योजनेंतर्गत ॲडव्हान्स मॉडयुलच्या अभ्यासक्रमासाठी तसेच विद्यमान औ. प्र. संस्थांमध्ये अधिकचे/नविन व्यवसाय सुरू करण्याकरिता मंजूर करण्यात आलेल्या पदांपैकी दि. ०१.०३.२०१७ ते ३०.०९.२०१७ या कालावधीत चालू ठेवण्यास मंजूरी देण्यात आलेली योजनांतर्गत अस्थायी पदे

| **अ.क्र.** | **पदनाम** | **६ व्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी** | | **पदांची संख्या** |
|---|---|---|---|---|
| | | वेतन बँड | ग्रेड वेतन | |
| | **गट-क** | | | |
| १ | प्रशिक्षण अधिकारी | ९३००-३४८०० | ४४००<br>४६००- वरिष्ठ श्रेणी | १०२ |
| | **एकूण** | | | **१०२** |

**कौशल्य विकास व उद्योजकत विभाग, शासन निर्णय क्रमांक : आयटीआय-२०१७/प्र.क्र.६३/ व्यशि-३, दिनांक : ०७ मार्च, २०१७ सोबतचे सहपत्र**

**प्रपत्र-२**

सेंटर ऑफ एक्सलन्स योजनेंतर्गत ॲडव्हान्स मॉडयुलच्या अभ्यासक्रमासाठी तसेच विद्यमान औ. प्र. संस्थांमध्ये अधिकचे/नविन व्यवसाय सुरू करण्याकरिता मंजूर करण्यात आलेल्या पदांपैकी दिनांक ०१.०३.२०१७ ते ३०.०९.२०१७ या कालावधीत चालू ठेवण्यास मंजूरी देण्यात आलेली योजनांतर्गत अस्थायी पदे

| **अ.क्र.** | **पदनाम** | **६ व्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी** | | **पदांची संख्या** |
|---|---|---|---|---|
| | | वेतन बँड | ग्रेड वेतन | |
| | **गट-क** | | | |
| १ | शिल्प निदेशक | ९३००-३४८०० | ४३००<br>४४००- वरिष्ठ श्रेणी<br>४८००-निवड श्रेणी | ६३ |
| | **एकूण** | | | **६३** |